परिवीक्षाधीन सरळसेवा वन परिक्षेत्र अधिका-यांना नियमित पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वनविभाग**

**शासन आदेश क्र.एफएसटी-२०२०/प्र.क्र.८५/फ-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक :- १८ मे, २०२०

वाचा :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१० (१)/ आस्था/ एक/ प्र.क्र.२८ (१७-१८)/४७७, दिनांक ०६.०३.२०२० रोजीचे पत्र.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र वनसेवा परिक्षा-२०१६ च्या अंतीम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने वन परिक्षेत्र अधिकारी गट-ब संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या वनक्षेत्रपालांपैकी ६ वनक्षेत्रपालांनी दिनांक १८/९/२०१७ ते १७/३/२०१९ दरम्यान कुंडल प्रशासन विकास व व्यवस्थापन अकादमी, कुंडल (महाराष्ट्र) येथे व १० वनक्षेत्रपालांनी दिनांक ९/१०/२०१७ ते ०८/०४/२०१९ दरम्यान कर्नाटक फॉरेस्ट अकादमी, गुंगरगट्टी, धारवाड (कर्नाटक) येथे १८ महिन्याचे प्रशिक्षण पूर्ण केले आहे. तसेच सदर ६ व १० वनक्षेत्रपाल अनुक्रमे दिनांक १८/०३/२०१९ ते १७/०३/२०२० व दिनांक ०९/०४/२०१९ ते ०८/०४/२०२० या दरम्यान १८ महिन्याचे क्षेत्रीय प्रशिक्षणापैकी १२ महिन्याचे क्षेत्रीय प्रशिक्षण घेतले आहे. तसेच अनुक्रमे दिनांक १८/३/२०२० व ९/४/२०२० पासून सदर परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकाऱ्यांना नियमित वन परिक्षेत्र अधिका-यांसोबत संलग्न करण्यात आले आहे.

२. सबब खालील परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिका-यांना क्षेत्रीय प्रशिक्षणाचे कार्यक्रमानुसार पुढीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | म.लो.आ. चे निवड यादीतील अनु क्र. | वन परिक्षेत्र अधिकारी यांचे नाव | सरळसेवेने नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेल्या पदाचे पदनाम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | ५ | अमित अरुण मुळीक | इ.मा.व. | पुणे | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण अक्कलकोट, सामाजिक वनीकरण विभाग, सोलापूर | रिक्त पदावर |
| २ | ७ | विश्वास रामभाऊ थोरात | खुला | अमरावती | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण नालगंगापूर (मोताळा), सामाजिक वनीकरण विभाग, बुलडाणा | रिक्त पदावर |
| ३ | ८ | धीरज धनराज मदने | खुला | अमरावती | वनक्षेत्रपाल (प्रादेशिक), पातूर, वन विभाग, अकोला | रिक्त पदावर |

| अ. क्र. | म.लो.आ. चे निवड यादीतील अनु क्र. | वन परिक्षेत्र अधिकारी यांचे नाव | सरळसेवेने नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेल्या पदाचे पदनाम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ४ | १० | संदिप श्रीरंग कुंभार | इ.मा.व. | पुणे | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), कोयना-१, वन्यजीव वन विभाग, कोल्हापूर | रिक्त पदावर |
| ५ | ११ | नितीन सुधाकर जाधव | वि.जा.-(अ) | नागपूर | वनपरिक्षेत्र अधिकारी (प्रादेशिक), आर्वी, वन विभाग, वर्धा | रिक्त पदावर |
| ६ | १२ | सागर दादासाहेब केदार | भ.ज.-(ड) | नाशिक | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), रेहेकुरी, वन्यजीव वन विभाग, पुणे (नाशिक वनवृत्त) | रिक्त पदावर |
| ७ | १३ | शेखर संपत देवकर | इ.मा.व. | नाशिक | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण पाथर्डी, सामाजिक वनीकरण विभाग, अहमदनगर | रिक्त पदावर |
| ८ | १४ | ऋषिकेश चंद्रकांत वाघमारे | इ.मा.व. | कोकण-१ | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), परळी, वन्यजीव वन विभाग, ठाणे | रिक्त पदावर |
| ९ | १६ | नरेंद्र अशोक सावंत (नरेंद्र विजय सावंत) | इ.मा.व. | नागपूर | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), डोंगरगाव, नवेगाव-नागझिरा व्याघ्र राखीव, वन्यजीव वन विभाग, गोंदिया (नागपूर वनवृत्त) | रिक्त पदावर |
| १० | १७ | सागर सदाशिव ढोले | भ.ज.-(ड) | औरंगाबाद | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), नागद वन्यजीव वन विभाग, औरंगाबाद | रिक्त पदावर |
| ११ | १८ | नितीन लक्ष्मण आटपाडकर | इ.मा.व. | अमरावती | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), खरबी, वन्यजीव वन विभाग पांढरकवडा | रिक्त पदावर |
| १२ | १९ | प्रदिप लक्ष्मण चव्हाण | इ.मा.व. | नागपूर | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), कोलारा, (कोअर) ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, वन्यजीव वन विभाग, चंद्रपूर | रिक्त पदावर |
| १३ | २० | श्रीनिवास देविदास गव्हाणे | इ.मा.व. | अमरावती | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण देऊळगावराजा, सामाजिक वनीकरण विभाग, बुलडाणा | रिक्त पदावर |
| १४ | २३ | उमेश महादेव जंगम | इ.मा.व. | नागपूर | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण राजुरा, सामाजिक वनीकरण विभाग, चंद्रपूर | रिक्त पदावर |

| अ. क्र. | म.लो.आ. चे निवड यादीतील अनु क्र. | वन परिक्षेत्र अधिकारी यांचे नाव | सरळसेवेने नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेल्या पदाचे पदनाम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १५ | २४ | विनायक कारभारी खैरनार | इ.मा.व. | अमरावती | वन परिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), कोरटा, वन्यजीव वन विभाग, पांढरकवडा | रिक्त पदावर |
| १६ | २८ | प्रेमचंद नरेंद्र तिडके | इ.मा.व. | औरंगाबाद | वनपरिक्षेत्र अधिकारी, सामाजिक वनीकरण मुदखेड, सामाजिक वनीकरण विभाग, नांदेड | रिक्त पदावर |

३. उपरोक्त परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकारी यांना खालील अटी/शर्तीचे अधीन राहून परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी म्हणून पदस्थापना येत आहे.

(१) सदर उमेदवाराची नियुक्ती ही परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी म्हणून करण्यात आली असून दीड वर्षाचा क्षेत्रीय प्रशिक्षण कार्यक्रमापैकी शिल्लक असलेला कार्यक्रम यशस्वीरीत्या पूर्ण करणे आवश्यक राहील. (अ.क्र.१ ते ६ चे बाबतीत दिनांक १७/९/२०२० पर्यंत व अ.क्र. ७ ते १६ बाबतीत दिनांक ८/१०/२०२० पर्यंत). वरील दिलेल्या पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार सांभाळूनच पदस्थापनेतील शिल्लक परिविक्षाधीन कालावधी म्हणून पूर्ण करावे लागेल. त्यानंतर याच पदावर उमेदवाराची पदस्थापना राहणार असून सदर पदावरचा एकूण पदावधी हा परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्याचे दिनांकापासून धरण्यात येईल.

(२) परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकाऱ्याने विहीत केलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण करणे आणि परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण करणे आवश्यक राहील. विहित क्षेत्रीय प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण न केल्यास किंवा विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण न केल्यास किंवा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण न केल्यास किंवा परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकारी सदर पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास, तो/ती सेवा समाप्त करण्यास पात्र राहील.

(३) सदर परिवीक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिका-यांनी नियुक्तीसंदर्भात अटी व शर्ती पालन करण्याबाबत बंधपत्र सादर केले आहे. सदर बंधपत्रातील अटींचे पालन करणे परिवीक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यास बंधनकारक राहील. जर परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यास बडतर्फ करण्यात आले किंवा परिवीक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकारी विना परवानगी सेवा सोडून गेल्यास बंधपत्रातील अटींनुसार परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकाऱ्याकडून व हमीदाराकडून रक्कम वसूल करण्यात येईल.

(४) शासनाने विहित केलेल्या हिंदी व मराठीची परीक्षा उत्तीर्ण होणे या सेवा शर्तीसह जर काही विशेष सेवाशर्ती असल्यास त्या लागू असतील.

(५) महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ मधील तरतुदीनुसार नियुक्ती दिलेल्या परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिका-यांनी संगणक अर्हता प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षांचे आंत प्राप्त करणे आवश्यक आहे. अन्यथा हा विहीत कालावधी संपल्यानंतर ते प्रमाणपत्र सादर करेपर्यंत किंवा सदर प्रमाणपत्र सादर करण्यास सूट मिळेपर्यंत अशा व्यक्तीची वेतनवाढ रोखून धरली जाईल आणि दरम्यानच्या कालावधीत त्यांचा पुढील पदोन्नतीसाठी विचार करण्यात येणार नाही.

(६) परिविक्षा कालावधी दरम्यान परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिका-यांनी रजा घेतल्यास (किरकोळ रजा वगळून) त्यांचा परिविक्षाधीन कालावधी तेवढ्या कालावधीने वाढविण्यात येईल अथवा संबंधीत अधिका-याची सेवा समाप्त करण्यात येईल.

(७) परिवीक्षा कालावधी दरम्यान कामाचे मूल्यमापन करून परिवीक्षा कालावधी समाप्तीबाबत निर्णय घेण्यात येईल.

(८) जर पोलीस खात्यामधू परिविक्षाधीन वनपरिक्षेत्र अधिकाऱ्याचे चारित्र्य व वर्तणूक चांगले नसल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाले तर त्यांची निवड केव्हाही रद्द करून सेवा समाप्त करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

४. मुख्य वनसंरक्षक / उप वन संरक्षक यांनी परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिका-यांचा क्षेत्रीय प्रशिक्षणाचा दर महिन्याला आढावा घ्यावा व त्यांना मार्गदर्शन करावे. परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिका-यांचे वरील पदस्थापनेच्या पदावर प्रथम ६ महिन्याचे कालावधीबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९/२/२०१६ व शासन सामान्य प्रशासन विभाग पुरक पत्र क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक ३/४/२०१७ अन्वये ठरवून दिलेल्या प्रपत्रात मुल्यमापन करावे.

५. शासन, महसूल व वनविभाग निर्णय क्र. एमएफएस-२०१८/प्र.क्र.४५/फ-८, दिनांक १४ ऑगस्ट, २०१८ नुसार सरळसेवेने नियुक्त सरळसेवा वन परिक्षेत्र अधिकारी यांचा प्रशिक्षण कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून गृहीत धरुन त्यांचे प्रशिक्षण सुरु झाल्याचे दिनांकापासून नियमित अर्हताकारी सेवा निश्चित करुन त्यांना सर्व प्रयोजनार्थ सेवा विषयक लाभ द्यावयाचे आहे. त्यानुसार कार्यवाही करावी.

६. वरील तक्त्यातील पदावर रुजू होणेकरीता परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिका-यांना संबंधित उपवनसंरक्षक यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिकारी रुजू होताच त्यांचा रुजू अहवाल संबंधित उपवनसंरक्षक यांनी या कार्यालयास उपलब्ध करुन द्यावा. तसेच वरील परिविक्षाधीन वन परिक्षेत्र अधिका-यांनी क्षेत्रीय प्रशिक्षणाचे १८ महिन्यांपैकी प्रथम १२ महिन्याचे क्षेत्रीय प्रशिक्षणाचे मुल्यमापन अहवालाचे प्रतिसह अहवाल ज्या वनविभागात हे १२ महिन्याचे क्षेत्रीय प्रशिक्षण घेतले आहे त्या वनविभागाचे उपवनसंरक्षक यांनी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालयास व आता वरील पदस्थापना दिलेल्या परिक्षेत्राचे उपवनसंरक्षक यांना उपलब्ध करुन द्यावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००५१८१५१९४७७११९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f379549945 2af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2020.05.18 15:35:04 +05'30'

**( बा.सि.शिंदे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक,सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर / पश्चिम मुंबई
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना, पुणे
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, व्याघ्र प्रकल्प मेळघाट, अमरावती
९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
१०) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व
११) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
१२) मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना, नागपूर
१३) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, व्याघ्र प्रकल्प सर्व
१४) वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, व्याघ्र प्रकल्प सर्व
१५) वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), सर्व